GR-200407211210230001-0300

नैसर्गिक आपदग्रस्तांना मदत....

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांक:सीएलएस-8-97/प्र.क्र.189/म-3,
मंत्रालय, मुंबई-400 032

दिनांक : 26 ऑगस्ट, 1997

**वाचा :-** 1) मुख्यमंत्र्यांच्या सचिवालयाचे परिपत्रक क्र.सीएमएफ-1189/032/96, दिनांक 5 ऑक्टोबर, 1996.
2) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक:सीएलएस-5994/प्र.क्र.135/म-3, दिनांक 17 एप्रिल, 1995.

नैसर्गिक आपत्तीत मृत पावलेल्या व्यक्तींना मुख्यमंत्र्यांच्या सचिवालयाचे परिपत्रक क्रमांक सीएमएफ-1189/032/96, दिनांक 5 ऑक्टोबर, 1996 अन्वयें आकस्मिक आग, चक्रीवादळ दरड कोसळल्यामुळे, समुद्राचे उधाण या नैसर्गिक आपत्तीत मृत पावलेल्या व्यक्तीमागे, सदरहू व्यक्तींच्या वारसास रु.25,000/- ची मदत मुख्यमंत्री मदत निधीतून करण्यात येत होती. तसेच वीज पडून मृत्यु पावलेल्या व्यक्तींच्या नातेवाईकांस प्रती व्यक्तीमागे रु.5,000/-ची मदत मुख्यमंत्री मदत निधीतून करण्यात येत होती. त्याचप्रमाणे दिनांक 17 एप्रिल, 1995 च्या शासन निर्णयास अनुसरुन नैसर्गिक आपत्तीमुळे निराधार होणा-या प्रत्येक व्यक्तीस रुपये 450/-चे सानुग्रह अनुदान देण्यात येते. संदर्भाधीन मदत वाढविण्याचा प्रस्ताव शासनाच्या काही काळ विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की,

1) पूर, अतिवृष्टी, गारपीट, आकस्मिक आग, चक्रीवादळ, दरड कोसळल्याने, समुद्राचे उधाण, भूकंप या नैसर्गिक आपत्तीत मृत पावलेल्या प्रत्येक व्यक्तीच्या वारसास या पुढे रु.50,000/- ची मदत देण्यात यावी.

2) वीज पडून मृत्यु पावलेल्या व्यक्तीच्या कुटुंबियास प्रत्येक मृतकामागे रु.10,000/- ची मदत देण्यात यावी.

3) नैसर्गिक आपत्तीने निराधार होणा-या प्रत्येक व्यक्तीस रु.600/- चे सानुग्रह अनुदान मंजूर करण्यात यावे.

निर्णय क्रमांक 1 व 2 संबंधी येणारा खर्च मागणी क्रमांक "सी-15-2245-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-02-पूर, चक्रीवादळे इत्यादी-101-अनुग्रह सहाय्य-(आठ)इतर बाबी (2245 0244)(योजनेतर)"या लेखाशीर्षाखाली करण्यात यावा.

निर्णय क्रमांक 3 संबंधीचा खर्च हा लेखाशीर्ष "2245-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-02-पूर, चक्रीवादळे, इत्यादी-101-अनुग्रह सहाय्य-(एक)रोख बेकारी भत्ता

कृ.मा.प.

(2245 0155)(योजनेतर)"या लेखाशीर्षाखाली करण्यात यावा.

उपरोक्त बाबींवर नैसर्गिक आपद्ग्रस्तांना द्यावयाच्या मदतीसंबंधीचे सर्व अधिकार यापुढे तहसिलदारांना देण्यात येत आहेत.

हा निर्णय दिनांक 1 ऑगस्ट, 1997 पासून अंमलात येईल.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ, प्रकरण क्रमांक 766/97/व्यय-9, दिनांक 26-8-97 अन्वयें मिळालेल्या सम्मतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(श.वि.वाडेकर)
सहसचिव, महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग

प्रति

विभागीय आयुक्त(सर्व)
जिल्हाधिकारी(सर्व)
उपविभागीय अधिकारी(सर्व)
तहसिलदार(सर्व)
महालेखापाल-1/2(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
महालेखापाल-1/2(लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई/उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग
वित्त विभाग(व्यय-9), मंत्रालय, मुंबई
महसूल व वन विभागातील सर्व कार्यासने
म-3 कार्यासन(निवडनस्ती), मंत्रालय, मुंबई.